**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक संप्रऊ २०२४/प्र.क्र.११६/९-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ मार्च, २०२५

**वाचा:-**
(१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. सिईओ-२०२१/प्र.क्र.१७३/९अे, दि. १३.०१.२०२२
(२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र. सीईओ-२०२२/प्र.क्र.२५९/९अे, दि. ०६.०३.२०२३
(३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.११५/९अे,दि. १८.०७.२०२३
(४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.११५/९अे,दि. २६.१०.२०२३
(५) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा.क्र. कृआ/फलो-२/सिट्रस इस्टेट/१३६७३/२०२४, दिनांक २१.०५.२०२४
(६) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा.क्र. कृआ/फलो-२/निधी मागणी/२-६/२०२५, दिनांक १३.०१.२०२५
(७) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र जा.क्र. कृआ/फलो-२/सिट्रस इस्टेट/३५१६/२०२५, दिनांक १५.०२.२०२५
(८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२.०२.२०२५

**प्रस्तावना :-**

तालुका फळरोपवाटिका, पैठण, जि. छत्रपती संभाजीनगर येथील प्रक्षेत्रावर मोसंबी फळपिकासाठी "सिट्रस इस्टेट" स्थापन करण्यास वरील वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर तालुका रोपवाटीका- पैठण प्रक्षेत्राऐवजी तालुका बीज गुणन केंद्र, इसारवाडी येथील प्रक्षेत्रावर मोसंबी फळपिकासाठी "सिट्रस इस्टेट" स्थापन करण्याबाबत वरील वाचा क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, मौजा मासोद, ता.चांदुरबाजार, जि. अमरावती येथे संत्रा फळपिकासाठी "सिट्रस इस्टेट" स्थापन करण्याबाबत वरील वाचा क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात होती. तद्नंतर मौजा मासोद, ता.चांदुरबाजार, जि. अमरावती येथील प्रक्षेत्राऐवजी तालुका बीजगुणन केंद्र, चांदुरबाजार, ता.चांदुरबाजार, जि. अमरावती येथील प्रक्षेत्रावर संत्रा फळपिकासाठी "सिट्रस इस्टेट" स्थापन करण्याबाबत वरील वाचा क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली. उक्त दोन्ही फळपिक इस्टेटकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढीप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सिट्रस इस्टेटची सन २०२४-२५ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी रुपये १८९७.३५ लाख (रुपये अठरा कोटी सत्त्याणव लाख पस्तीस हजार फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) उपलब्ध करुन देण्यात येत

आहे. उक्त निधी खालील सिट्रस इस्टेसाठी खर्ची करण्यात यावा.

| अ.क्र. | सिट्रस इस्टेट | निधी (रु. लाखात) |
|---|---|---|
| १. | तालुका बीज गुणन केंद्र, ईसारवाडी, ता. पैठण, जि. संभाजीनगर (मोसंबी इस्टेट) | १५२२.३५ |
| २. | तालुका बिजगुण केंद्र, चांदुरबाजार, ता. चांदुरबाजार, जि.अमरावती (संत्रा इस्टेट) | ३७५.०० |
| | एकूण | १८९७.३५ |

**२.** वरीलप्रमाणे उपलब्ध करुन दिलेला निधी चालू वर्षी पुढील लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३. २४०१ पीक संवर्धन,
११९ बागायती व भाजीपाला पिके, (०३) रोपमळे,
(०३) (३९) सिट्रस इस्टेट राज्य योजना, (२४०१ B०२५)

**३.** सदर "सिट्रस इस्टेट"ची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने निधी वितरणासाठी खालीलप्रमाणे संनियंत्रण अधिकारी व आंहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहेत.

| **अ.क्र.** | **अंमलबजावणी स्तर** | **संनियंत्रण अधिकारी** | **आंहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १. | कृषि आयुक्तालय | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे |
| २. | विभाग स्तर | विभागीय कृषि सहसंचालक, छ.संभाजीनगर/अमरावती | लेखाधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक यांचे कार्यालय, छ.संभाजीनगर/अमरावती |
| ३. | जिल्हा स्तर | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, छ.संभाजीनगर/ अमरावती | लेखाधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालय, छ.संभाजीनगर/अमरावती |

**४.** निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

**५.** सदर "सिट्रस इस्टेट" करिता वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगीता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) यांनी शासनास वेळोवेळी सादर करावे.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः अर्थसं २०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दिनांक १२.०२.२०२५ मधील अटी व शर्तीचे अनुपालन करण्याच्या अधीन राहून विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्य येत आहे.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२२/का. १४३१, दिनांक ०७.०३.२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १००/२०२५/व्यय-१, दिनांक २१.०३.२०२५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharrashtra.gov.in या संकेतस्थळावर उप करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३२६१४५८५१२४०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VAISHALI MACHHINDRANATH TAMBE
Date: 2025.03.26 15:00:06 +05'30'

**(वैशाली तांबे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र राज्य.
६) मा. सभापती/उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई.
७) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.
८) सर्व मा. विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
९) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२) प्रधान सचिव (कृषि), यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५) विभागीय कृषि सहसंचालक, छत्रपती संभाजीनगर/अमरावती.
१६) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, छत्रपती संभाजीनगर/अमरावती
१७) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.
१९) संचालक, लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती).
२०) जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर/अमरावती.
२१) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२२) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२३) निवड नस्ती.